सन २०२५-२६ या वित्तीय वर्षाकरिता महाराष्ट्र राज्य समाजकल्याण बोर्डास निवृत्तीवेतन व वेतनेतर बाबींसाठी निधी वितरीत करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**महिला व बाल विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक-सकबो-२०२५/प्र.क्र.४३/का-१०**
नविन प्रशासन भवन, तिसरा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक- १६ मे, २०२५.

संदर्भ :-

१. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२५/प्र.क्र.४४/अर्थ-३, दि.०७.०४.२०२५.
२. वित्त विभाग, शासन निर्णय क्र.संकीर्ण २०२३/प्र.क्र.११०/२०२३/ कोषा प्रशा-५, दि.१४.०२.२०२४,
३. महिला व बाल विकास विभाग, शासन निर्णय क्र.बीजीटी-२०२४/प्र.क्र.२९/का-४, दि.०९.०९.२०२४.

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र राज्य समाजकल्याण बोर्डातील योजना व मुख्यालयातील निवृत्तीवेतन धारकांच्या निवृत्तीवेतनावरील खर्चासाठी व वेतनेतर बाबींवरील खर्चासाठी खालील विवरणपत्रातील रकाना क्रमांक (२) मधील लेखाशीर्ष/ उद्दिष्टाकरिता रकाना क्रमांक (४) प्रमाणे एकूण **₹४६०.०० लक्ष (अक्षरी रुपये चार कोटी साठ लक्ष फक्त)** इतका निधी वितरीत करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

(रुपये लक्ष)

| अ.क्र. | प्रधान/ लेखाशिर्ष / संगणक सांकेतांक/ उद्दिष्ट | अर्थसंकल्पीय तरतूद | या आदेशान्वये वितरीत करण्यात येत असलेला निधी |
|---|---|---|---|
| (१) | (२) | (३) | (४) |
| १ | मागणी क्र.एक्स-१,<br>२२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण,<br>०२, समाजकल्याण, १०२, बाल कल्याण,<br>(०२) (०४) महाराष्ट्र राज्य समाजकल्याण मंडळाला सहायक अनुदान (अनिवार्य),<br>(२२३५ बी ९४२ )<br>३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) | **१२८४.८५** | **४६०.००** |

२. सदर निधीसाठी नियंत्रक अधिकारी म्हणून आयुक्त, महिला व बाल विकास, पुणे हे राहतील. त्यांचेकडे हा निधी सुपूर्द करण्यात येत आहे. त्यानुसार आयुक्त, महिला व बाल विकास, पुणे यांनी

सदर निधी खर्च करतांना महाराष्ट्र अर्थसंकल्प नियम पुस्तिका व वित्तीय अधिकार नियम पुस्तिकेमध्ये उल्लेख केलेल्या तसेच नियोजन व वित्त विभागाने यापूर्वी निर्गमित केलेल्या मार्गदर्शक सूचना व प्रचलित निकष, वित्तीय अधिकारांचे प्रत्यायोजन तसेच वित्त विभागाने वेळोवेळी दिलेल्या मार्गदर्शक सूचनांचे काटेकोरपणे पालन करावे. त्याचप्रमाणे विहीत कार्यपध्दतीनुसार निधी खर्च करण्यात यावा.

३. सदर शासन निर्णयान्वये वितरित करण्यात आलेल्या निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर करण्याची दक्षता सचिव, महाराष्ट्र राज्य समाजकल्याण बोर्ड, चेंबूर, मुंबई यांनी घ्यावी.

४. आहरण व संवितरण अधिकाऱ्यांना म.को.नि. नमुना क्रमांक ४४ देयकांव्दारे राज्याच्या एकत्रित निधीतून २७- लहान बांधकामे, ३१-सहायक अनुदाने (वेतनेतर), ३३-अर्थसहाय्य, ३५ भांडवली मत्तेच्या निर्मितीकरिता अनुदान, ५०-इतर खर्च, ५३-मोठी बांधकामे आणि वित्त विभागाव्दारे वेळोवेळी घोषित करण्यात येतील अशा अन्य उद्देश शीर्ष (Object Head) अंतर्गत आहरित केल्या जाणाऱ्या सहायक अनुदानाच्या निधीचा विनियोग करण्यासाठी "आभासी वैयक्तिक ठेव लेखा [Virtual Personal Deposit Account (VPDA)]" ही व्यवस्था व कार्यपध्दती लागू करण्यात यावी, अशा सूचना वित्त विभागाने संदर्भाधीन क्र.२ येथील दि.१४.०२.२०२४ च्या शासन निर्णयान्वये दिल्या आहेत. त्यानुसार महिला व बाल विकास विभागाने संदर्भाधीन क्र.३ येथील दि.०९.०९.२०२४ च्या शासन निर्णयान्वये सदर उद्देश शीर्ष (Object Head) अंतर्गत आहरित केल्या जाणाऱ्या सहायक अनुदानाच्या निधीचा विनियोग करण्यासाठी "आभासी वैयक्तिक ठेव लेखा [Virtual Personal Deposit Account (VPDA)]" ही व्यवस्था व कार्यपध्दती लागू करण्यास मान्यता दिलेली आहे. तसेच, सदर शासन निर्णयासोबतच्या परिशिष्ट-अ मध्ये नमूद आहरण व संवितरण अधिकारी यांना सदर शासन निर्णयाव्दारे आभासी वैयक्तिक लेखा प्रशासक म्हणून घोषित करण्यात आले आहे. त्यामुळे वित्त विभागाच्या दि.१४.०२.२०२४ व महिला व बाल विकास विभागाच्या दि.०९.०९.२०२४ च्या शासन निर्णयातील नमूद अटी व शर्तीचे पालन करुन आभासी वैयक्तिक ठेव लेखा प्रशासक यांनी विहीत कार्यपध्दतीचा अवलंब करुन सदर शासन निर्णयान्वये वितरीत केलेला निधी महाराष्ट्र राज्य समाजकल्याण बोर्डास वितरीत करावा.

५. सदर शासन निर्णयान्वये वितरित करण्यात आलेला निधी चालू वित्तीय वर्षात खर्च करण्याची तसेच अखर्चित राहणारा निधी दि.३१.०३.२०२६ पूर्वी समर्पित करण्याची दक्षता सचिव, महाराष्ट्र राज्य समाजकल्याण बोर्ड, चेंबूर, मुंबई यांनी घ्यावी.

६. हा शासन निर्णय वित्त विभागाने अनौपचारिक संदर्भ क्र.१५८/व्यय-६, दि.०९.०५.२०२५ अन्वये दिलेल्या सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२५०५१६१२३०४६७८३० असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SAHEBRAO DHANRAJ BHOYE

Digitally signed by SAHEBRAO DHANRAJ BHOYE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WOMEN AND CHILD DEVELOPMENT DEPARTMENT,
2.5.4.20=201303bc41ec1fa4d14ccef33019b230317b039f951887dd25d72febda91bf82,
postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=9F3A08DCEC2321C344A1916033CF8C938EFBE80C42926638012D340624F73C19, cn=SAHEBRAO DHANRAJ BHOYE
Date: 2025.05.16 12:31:53 +05'30'

**( साहेबराव भोये )**

**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे,

२. सचिव, महाराष्ट्र राज्य समाजकल्याण बोर्ड, चेंबूर, मुंबई,

३. महालेखापाल- महाराष्ट्र-१/२ (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर,

४. महालेखापाल- महाराष्ट्र-१/२ (लेखा परिक्षा), मुंबई / नागपूर,

५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,

६. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई,

७. जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी, मुंबई उपनगर,

८. नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई,

९. वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,

१०. कक्ष अधिकारी (का-४), महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई यांना सदर निधी बीडीएस प्रणालीवर वितरीत करण्याच्या विनंतीसह अग्रेषित.

११. निवड नस्ती, का-१०.